कविकुलगुरु कालीदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक येथील ॲकडेमिक रिसर्च सेंटर इमारतीच्या दुसऱ्या मजल्याच्या बांधकामासाठी निधी वितरीत करणेबाबत.....

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र.केएसयू-२०१९/प्र.क्र.०२/विशि-२**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २८ मार्च, २०२४.

**वाचा :-** १. दि.३०.०३.२००९ रोजीचा शासन निर्णय.

२. विभागाचा समक्रमांकाचा दि.१५.०३.२०२४ रोजीचा शासन निर्णय.

**प्रस्तावना** : कवीकुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठातील ॲकेडमिक रिसर्च सेंटर इमारत बांधकामासाठी (G+१) वाचा क्र.१ येथील दि.३०.०३.२००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.५१३.६६ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. सदर प्रशासकीय मान्यतेस अनुसरुन विद्यापीठास संपूर्ण निधी वितरीत करण्यात आला आहे. सदरहू निधीतून इमारतीचे बांधकाम पूर्ण झाले आहे. रामटेक परिसरातील ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांची वाढती संख्या विचारात घेता सदर ठिकाणी विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक वापरासाठी वरील इमारतीचा पहिला मजला अपुरा पडत असल्याने इमारतीच्या विस्तारीकरणासाठी दुसऱ्या मजल्याचे बांधकाम प्रस्तावित करण्यात आले होते.

त्यानुसार कविकुलगुरु कालीदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक येथील ॲकडेमिक रिसर्च सेंटर इमारतीच्या दुसऱ्या मजल्याचे बांधकाम करण्याकरिता रु.४,६५,५८,३२७/- इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास वाचा क्र.२ दि.१५.०३.२०२४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. आता सदर कामास निधी देण्याची वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. तद्नुषंगाने वित्त विभागाने या कामास निधी देण्यास सहमती दर्शविल्यानुसार वरील कामास निधी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** कविकुलगुरु कालीदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक येथील ॲकडेमिक रिसर्च सेंटर इमारतीच्या दुसऱ्या मजल्याच्या बांधकामासाठी रु.८९,३०,०००/- (अक्षरी रुपये एकोणनव्वद लक्ष तीस हजार फक्त) इतकी तरतूद खलील अटीच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. **अटी व शर्ती :-**

१. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी अनुदान मंजुर केले आहे, त्याच उद्दिष्टासाठी वापर करावा आणि त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक (उच्च शिक्षण), पुणे यांचेमार्फत तात्काळ शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

२. बांधकामाची प्रगती शासनास वेळोवेळी अवगत करावी.

३. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

४. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई किंवा प्रकरण परत्वे महालेखापाल-२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

३. सदरहू मंजूर झालेला निधी कविकुलगुरु कालीदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक यांना तातडीने उपलब्ध करुन देण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

४. सदर कामाचा खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण १०४, विद्यापीठांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना १०२, विद्यापीठांना सहाय्य, (००) (१४) कवी कालिदास संस्कृत विद्यापीठ, नागपूर यांचा विकास (२२०२ ३४९५), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" लेखाशिर्षाखाली सन २०२३-२०२४ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२३, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

६. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१७०/१४७१, दि.१९.०३.२०२४ वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४५२/२०२४/व्यय-५, दि.२६.०३.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३२८१८५५५३३४०८ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHARAD SARJERAO KOKATE

Digitally signed by SHARAD SARJERAO KOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=be7c6620763057633615219 44ed5ba258ae7d29f78cddb94fc3e83bfa2424200, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=95D25EC736C5F76DA241E96AD9552FF908EFC6582DF4A4ECADD1C4C6CD038195, cn=SHARAD SARJERAO KOKATE
Date: 2024.03.28 19:05:35 +05'30'

**(शरद कोकाटे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. कुलगुरु, कवी कुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक.
३. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.(५ प्रती)
४. कुलसचिव, कवी कुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक.
५. सह संचालक(उच्च शिक्षण), नागपूर विभाग, नागपूर.

६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र नागपूर.
७. महालेखापाल, (लेखा परीक्षण) -२, महाराष्ट्र नागपूर.
८. अधिदान व लेखा अधिकारी, पुणे/ नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ नागपूर.
१०. कार्यासन अधिकारी (का-१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. वित्त विभाग, (व्यय-५) (अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१३. उप सचिव, (विशि) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१४. उप सचिव (अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५. अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.